सांगली जिल्ह्यातील विटा येथे स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) न्यायालयाच्या निधीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-०११९/९६८/प्र.क्र.३/का-११.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२०.

संदर्भ : १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. संकीर्ण २०१९/९६८/प्र.क्र.३/कार्या-११, दि. २३ जुलै, २०१९.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक २०१९/प्र.क्र.११५/अर्थ ३,दि.३/१/२०२०.
३. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. संकीर्ण २०१९/९६८/प्र.क्र.३/कार्या-११, दि. २५ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना :**

मा. उच्च न्यायालयाच्या प्रस्तावानुसार सांगली जिल्ह्यातील विटा येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) स्थापन करण्यास शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१९/९६८/प्र.क्र.३/कार्या-११, दि. २३ जुलै, २०१९ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, सदर न्यायालयासाठी संदर्भिय अनुक्रमांक ३ येथील दि.२५/२/२०२० च्या शासन निर्णयानुसार पदनिर्मिती केलेली आहे. या प्रकरणी डिसेंबर-२०१९ च्या अधिवेशनामध्ये लाक्षणिक पुरवणी मागणी वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर केली होती. ती मंजूर झालेली आहे. अशाप्रकारे सदर न्यायालयासाठी निधी उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सांगली जिल्ह्यातील विटा येथे स्थापन केलेल्या दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) न्यायालयाकरीता खालीलप्रमाणे लाक्षणिक पुरवणी मागणी विधानमंडळाने मंजूर केलेली आहे.

| अ.क्र. | उद्दिष्ट | रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १ | ०१-वेतन | १,०००/- |
| २ | ०३-अतिकालीक भत्ता | १,०००/- |
| ३ | ०६-दूरध्वनी, वीज, पाणी | १,०००/- |
| ४ | ११-प्रवास खर्च | १,०००/- |
| ५ | १३-कार्यालयीन खर्च (आवर्ती) | १,०००/- |
| ६ | १३-कार्यालयीन खर्च (अनावर्ती) | १,०००/- |
| ७ | १७-संगणक खर्च | १,०००/- |
| | एकूण | ७,०००/- |

२. सदर लाक्षणिक पुरवणी मागणी, मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान,१०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१)जिल्हा व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) ( २०१४ ०१७२) या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर लाक्षणिक पूरवणी मागणीचा उपरोक्त तक्त्यातील नमूद ६ उद्दिष्टांकरिता मंजूर झालेला रू. ७,०००/-(अक्षरी रुपये सात हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांगली (जे-००२५) यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. सदर न्यायालयासाठी आवश्यक तो खर्च उपरोक्त नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३१/२०/व्यय-५, दि.१३/१/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२७१५०६३४८११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.02.27 15:16:34 +05'30'

**( सं. सं. नवगिरे )**
**कार्यासन अधिकारी,**

**प्रति,**

१. मा.प्रबंधक(निरिक्षणे-१/२), उच्च न्यायालय(अ.शा), मुंबई.(पत्राने).
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांगली.
३. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
५. वित्त विभाग, कार्यासन - व्यय-५/ अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.
६. विधि व न्याय विभाग, कार्या-२३ व २४ मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती/ कार्या-११.

***********************************